


वाचन पातळी २

# बहुरंगी

**Author:** Kamla Bakaya
**Illustrator:** Audrey Agnier
**Translator:** Mukund Taksale



## बोलवा आता आणखी कुणा

म्हातारीची गंमत भारी
गाजर बी ती मातीत पेरी।
बीतून उगवे अंकुर झरझर
रोप शोभते आणि त्यावर॥

खाऊनिया खत मटामटा
वाढे गाजर पटापटा।
उपटू गाजर, आता चटकन
गाजर हलवा बनवू पटकन॥

धरली शेंडी, लावला जोर गाजर
आपले जागेवर।
जमेना हो जमेना,
बोलवा आता आणखी कुणा॥



म्हातारीचा नातू आला
त्याने आता जोर लावला।
जमेना हो जमेना,
बोलवा आता आणखी कुणा॥



म्हातारीचा कुत्रा आला,
धापा टाकत जोर लावला।
जमेना हो जमेना,
बोलवा आता आणखी कुणा॥



गोंधळ ऐकून हा कानी
मनीमाऊ ती आली झणी।
सारे मिळूनी लावला जोर गाजर
आले उपटून वर॥

हुर्रे ऽऽऽऽ हुर्रे ऽऽऽऽऽ
आम्ही आज जिंकलो रे!





## चंदू

चंदूची ती अक्कल कोती
सदैव हाती पुस्तक पोथी।
सदा मुखातून वाहे ज्ञान
जणू हा कोणी पंडित महान॥

एके दिवशी पोथी वाचूनी
विचार मोठ्ठे आले मनी।
असले काही काम करीन मी
जगामध्ये अन् नाव करीन मी॥



घरी कुणाच्या लागे आग
धावत जाईन काढीत माग।
आगीत घेऊन उडी क्षणात
परोपकारी ठरीन जगात॥

मरणाऱ्याला जीवन-दान
देईल त्याला जगात मान।
दूर करी जो दुःख वेदना
शूर वीर तो खराच जाणा॥





धावत येऊन म्हणते ताई
चंदूदादा, कर रे घाई।
हात भाजला बाळाचा तो
रडूनी घर डोक्यावर घेतो॥

आई गेली कामावर
टाकूनी माझ्यावरती घर।
कुठे कुठे मी आता धावू?
औषध आणण्या कोठे जाऊ?

समाधीतूनी चंदू जागा
म्हणे तिला तो करूनी त्रागा।
आली तरतर त्रास द्यायला
हळद लाव, मी हवा कशाला?



घेऊनी गोष्टी अशा फालतू
माझ्यापाशी येऊ नको तू।
घरची कटकट जेव्हा तेव्हा
लिहू-वाचू मी आता केव्हा?

भावाचे हे भाषण ऐकून
मागे फिरली ती वैतागून।
शांत करी ती रडत्या बाळा
दिवस कसा तरी निघून गेला॥

संध्याकाळी आली आई
चंदू-गाथा वदली ताई।
खोलीत त्याच्या गेली आई
म्हणे, तुला रे हृदयच नाही॥



रडे बिचारा भाऊ छोटुला
औषध आणण्या का नच गेला?
पुस्तक वाचून सांगे ज्ञान
बघा कोरडा हा पाषाण॥

घरच्या कामा कधी न आले
चुलीत घाल रे ज्ञानच असले!
उजेड घ्या बघूनी दिवट्याचा
कोल्हा आणतो आव वाघाचा॥

## गाडीनं ठोकलं म्हातारबुवांना

आज्जी, आज्जी, आज्जी गं आज्जी
काय रे बाळा, पुसते आज्जी।
वाईट झालं गं वाईट झालं
सांग सांग बाळा, काय झालं?

म्हातारबुवा, ते गं आपले,
मोटारखाली आले, आले।
खूप लागलं, गरीब बिचारे!
दिवसा दिसले डोळां तारे॥





नाकी डोळा धो धो धार
भिजून चेहरा गारच गार।
कुणी न येई वाचवण्याला
पळून गेला मोटारवाला॥

ऐकून आज्जी खूप घाबरे
रामा रामा! काय हे बरे!
चल चल, कसली वेळ ही आली!
म्हातारबुवा मोटारखाली!

बाळा, चल, चल, उचल पावले
क्षणात दोघे बाहेर आले।
आजी बघते इकडेतिकडे
म्हातारबुवा कुणीकडे?

डाराडूर पडलेले भूवर
खेळातील पं पं पोटावर।
हत् मेल्या! हसली आज्जी
कसली ही रे थट्टा माझी?





## छोटुकली मी छोटी छोटी

छोटुकली मी छोटी छोटी
भीती-बिती मज ठाऊक नाही।
माझ्या मनची मी तर राणी
ऐट कुणाची चालणार नाही॥

चेहरा माझा साधाभोळा डोळे
माझे काजळकाळे।
नाचत ठुमकत बागडते
मी फुलपाखरू जणू आगळे॥



रातकिडे गुणगुणती राती
आई म्हणते, पऱ्याच येती।
शहाण्या आमच्या बाळांना
या झोपायाला गाणी गाती॥

भोळी मी, आईला म्हणते
बोलव ना गं त्यांना आत।
दटावते प्रेमाने आई झोप
आता बघ झाली रात॥

ठाऊक नाही कसे हे घडले
झोपेमध्ये बाहेर पडले ।
पऱ्या कोण हे काढू शोधून
उत्सुकता मनी आली दाटून ॥

आकाशामध्ये तारे दूरवर
मला पाहूनी हसले खुदकन ।
प्रेमाने मिचकावून डोळे
बोलवले मज त्यांनी पटकन ॥



क्षणात आले पंख कुठूनसे
जादूने ते मला चिकटले।
पंखांनी मज उंच उचलले
आकाशी मज घेऊन गेले॥

आकाशातून उडता उडता थवा
पऱ्यांचा दिसला मजला।
परीराणी ती जवळी आली
क्षणात आमची गट्टी झाली॥

आल्या भोवती पऱ्या सर्व मग
जवळ मला त्या घेण्यासाठी।
सकाळ झाली, उठा लाडोबा
आई उठवे शाळेसाठी॥

## Story Attribution:

This story: बहुरंगी is translated by Mukund Taksale . The © for this translation lies with Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'सबरंग', by Kamla Bakaya . © Pratham Books , 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

'Bahurangee' has been published on StoryWeaver by Pratham Books. The development of this book has been supported by HDFC Asset Management Company Limited- a joint Venture with Standard Life Investments. www.prathambooks.org

## Images Attributions:

Cover page: A girl flying in the night sky with two small fairies, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: An old woman gesturing with her hand, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: A carrot emerging from the soil ready to be picked, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: A man relaxing on the ground with a dog behind him, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: An old woman, a man, and a dog all one behind the other trying to pull a carrot from the ground, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: A cat sleeping peacefully on a brick wall, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: An old woman sitting happily on the ground with a cat and holding a carrot in her hand, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: A boy buried in his books, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: A boy flying with a cape towards a city, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: A day-dreaming boy sitting royally on a bed surrounded by books, by Audrey Agnier © Pratham Books, 2015. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# बहुरंगी

(Marathi)

कमला बकाया यांची स्वतःची अशी खास शैली आहे. खोडकर छोटुकल्यांसाठी त्यांच्या गमतीशीर कविता !

या पुस्तकाची वाचन पातळी २ आहे. ओळखीचे शब्द जाणून वाचणाऱ्या आणि मदत घेऊन नवे शब्द वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

